**नागपूर न्यायिक जिल्ह्याकरिता एकूण १०० प्रिंटर खरेदी करण्याकरिता रु.११,०४,०००/- इतक्या रक्कमेच्या प्रस्तावास प्रशासकीय मान्यता देणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**विधि व न्याय विभाग,**
**शासन निर्णय क्रमांक : संप्रिसा- २०२४/प्र. क्र. ०३/का. ७**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
दिनांक : ५ जुलै, २०२४.

**संदर्भ:-** १) माहिती तंत्रज्ञान विभाग, शासन निर्णय दिनांक ०१/०८/२०११.
२) केंद्रीय प्रकल्प समन्वयक, ई-कोर्ट प्रकल्प, अपील शाखा, उच्च न्यायालय, मुंबई यांचे पत्र क्र. Spl./Comp/०२७/२०२४, दिनांक २४/०१/२०२४.
३) समक्रमांकाचे शासन पत्र दिनांक ०७/०२/२०२४.
४) केंद्रीय प्रकल्प समन्वयक, ई-कोर्ट प्रकल्प, अपील शाखा, उच्च न्यायालय, मुंबई यांचे पत्र क्र. Spl/Comp/६५/२०२४, दिनांक १६/०२/२०२४, दि.१५/०४/२०२४
५) विभागाच्या दिनांक २५/०६/२०२४ रोजीच्या प्रकल्प अंमलबजावणी समितीच्या बैठकीचे इतिवृत्त.

**<u>प्रस्तावना</u> :-**

केंद्रीय प्रकल्प समन्वयक, ई-कोर्ट प्रकल्प, अपील शाखा, उच्च न्यायालय, मुंबई यांनी नागपूर न्यायिक जिल्ह्याकरिता एकूण १०० प्रिंटर खरेदी करण्याचा प्रस्ताव संदर्भ क्र. २ अन्वये शासनास सादर केला होता. संदर्भ क्र. ३ अन्वये या प्रस्तावाच्या अनुषंगाने काही मुद्दांची माहितीसह प्रस्ताव फेरसादर करण्यास कळविले. यानुषंगाने संदर्भ क्र. ४ अन्वये सुधारित प्रस्ताव फेरसादर करण्यात आला. सदर प्रस्तावास माहिती तंत्रज्ञान संचालनालयाचे अभिप्राय घेण्यात आले असून, संदर्भ क्र. ५ अन्वये विभागाच्या प्रकल्प अंमलबजावणी समितीच्या दिनांक २५/०६/२०२४ रोजी झालेल्या बैठकीत मान्यता देण्यात आली. त्यानुसार नागपूर न्यायिक जिल्ह्याकरिता एकूण १०० प्रिंटर खरेदी करण्याच्या प्रस्तावास प्रशासकीय मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**<u>शासन निर्णय</u> :-**

नागपूर न्यायिक जिल्ह्याकरिता एकूण १०० प्रिंटर खरेदी करण्याकरिता **रु.११,०४,०००/-** (अक्षरी रुपये अकरा लक्ष चार हजार फक्त) इतक्या रकमेच्या प्रस्तावास या शासन निर्णयान्वये प्रशासकीय मान्यता देण्यात येत आहे.

२. प्रिंटर्स खरेदीचा तपशील खालीलप्रमाणे आहे:-

| अ. क्र. | संगणक सामग्री | संख्या | दर | एकूण रुपये |
|---|---|---|---|---|
| १. | प्रिंटर्स | १०० | ११,०४०/- | ११,०४,०००/- |

३. प्रिंटर्स खरेदी करताना माहिती तंत्रज्ञान संचालनालयाचे खालीलप्रमाणे अभिप्राय आहेत:-

"It is to state that specifications are of specific make and hence it needs to be make generic by removing Company name, BIS nos, Dimension and Weight."

उपरोक्त अभिप्रायानुसार प्रिंटर्स खरेदी करताना दक्षता घेण्यात यावी.

४. सदर संगणक सामग्री खरेदी ही उद्योग, ऊर्जा व कामगार विभागाच्या दिनांक २४.०८.२०१७ व ०८.१२.२०१७ रोजीच्या शासन निर्णयानुसार GeM पोर्टलवरुन शासनाच्या विहित पध्दतीने करण्यात यावी.

५. याप्रित्यर्थ होणारा खर्च "मागणी क्र. जे-२, २०५२ सचिवालय सर्वसाधारण सेवा, (००) विधि व न्याय विभाग, (००) (०२) ई-गव्हर्नन्स प्रकल्पाच्या अंमलबजावणीसाठी तरतूद (२०५२ ५११६) या लेखाशिर्षाखाली १७ संगणक खर्च" या उदिष्टांतर्गत भागविण्यात यावा.

६. संदर्भ क्र. १ येथील शासन निर्णयातील तरतुदींचे पालन करुन कालबाह्य प्रिंटर्स निर्लेखनाबाबत आवश्यक कार्यवाही करण्यात यावी.

७. सदर शासन निर्णय वित्त विभागाच्या शासन निर्णय क्र. विअप्र २०१३/प्र.क्र.३०/२०१३/ विनियम, भाग-२, दिनांक १७ एप्रिल, २०१५ अन्वये वित्तीय अधिकार नियम पुस्तिका १९७८ भाग-१ उप विभाग-२ मधील अ. क्र. २७ (अ) नियम क्र. ७६ अन्वये प्रशासकीय विभागांना प्रदान करण्यात आलेल्या अधिकारानुसार निर्गमित करण्यात येत आहे.

८. यानुषंगाने निधीबाबतचे आदेश स्वतंत्रपणे निर्गमित करण्यात येतील.

९. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०२४०७०५१२०६२५९२१२ असा आहे. हा शासन निर्णय डिजिटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

ASHISH ARVINDRAO AYACHIT

Digitally signed by ASHISH ARVINDRAO AYACHIT
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=LAW AND JUDICIARY DEPARTMENT,
2.5.4.20=3d6a5e330b3b57f01daab1dbb0968a1823ebae88f93a4b8312e0276db894e483, postalCode=400032, st=Maharashtra,
serialNumber=7192473332944CE7C0ACBF0C66959B3BC3088FE6AC83A09BD02BC394AED7EA8D, cn=ASHISH ARVINDRAO AYACHIT
Date: 2024.07.05 12:17:32 +05'30'

**( आशिष अयाचित )**
**विधि सल्लागार-नि-सह सचिव.**

**प्रति,**

१. मा. महाप्रबंधक, उच्च न्यायालय, मुंबई,

२. केंद्रीय प्रकल्प समन्वयक, ई-कोर्ट प्रकल्प, अपील शाखा, उच्च न्यायालय, मुंबई,

३. प्रमुख, जिल्हा व सत्र न्यायाधीश, नागपूर,

४. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता),-१/ २, मुंबई/नागपूर,

५. महालेखापाल (लेखा परीक्षा)-१/२, मुंबई/नागपूर,

६. अपर मुख्य सचिव, वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई,

७. प्रधान सचिव, नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई,

८. प्रधान सचिव, माहिती व तंत्रज्ञान विभाग, मंत्रालय, मुंबई,

९. संचालक, माहिती तंत्रज्ञान संचालनालय, मंत्रालय, मुंबई,

१०. अधिदान व लेखा अधिकारी, ६ व ७ वा मजला अेपीजे हाऊस, दिनशॉ वांच्छा रोड, के. सी. कॉलेज जवळ,चर्चगेट, मुंबई-२०.

११. संचालनालय, लेखा व कोषागारे, ६ व ७ वा मजला अेपीजे हाऊस, दिनशॉ वांच्छा रोड,के. सी. कॉलेज जवळ,चर्चगेट, मुंबई-२०.

१२. कार्यासन अधिकारी १३, २३ व २४, विधि व न्याय विभाग, मंत्रालय, मुंबई,

१३. जिल्हा कोषागार अधिकारी, नागपूर,

१४. निवड नस्ती/का. ७